**सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित) या पदावर नामनिर्देशनाने तात्पुरती नियुक्ती देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१६७/सेवा-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १३ मार्च, २०२४.

**<u>संदर्भ</u> :** १. सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्रमांक : एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.७.२०२१.
२. मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.विभाग, मुंबई यांचेक्र.मुअ(मुं)/वि.अ./पदभरती/९९२, दि.२६.०२.२०२४ रोजीचे पत्र.
३. सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्रमांक :एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२८१/१२, दि.२१.०६.२०२१

**<u>शासन आदेश</u> :-**

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित) (वेतनस्तर एस-१५ रुपये ४१,८००-१,३२,३००/- या वेतनश्रेणीत) या संवर्गात नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यासाठी या विभागाच्या दि.१३.१२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये मुख्य अभियंता (स्थापत्य), सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय निवड समिती गठीत करण्यात आली आहे. सदर निवड समितीमार्फत दि.१०.१०.२०२३ रोजी जाहिरात प्रसिध्द करण्यात आली होती. सदर जाहिरातीच्या अनुषंगाने मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी गुणवत्तेनुसार पात्र ठरलेल्या ५३२ उमेदवारांची यादी गुणवत्ता क्रमांकानुसार www.mahapwd.com या संकेतस्थळावर प्रसिध्द केली असून या उमेदवारांना नियुक्ती देण्यासाठी संदर्भाधीन क्र.२ येथील दिनांक २६.०२.२०२४ रोजीच्या पत्रान्वये शासनास शिफारस केली आहे. त्यानुसार सोबतच्या **परिशिष्ट-अ** मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांची कनिष्ठ अभियंता, (स्थापत्य) गट-ब (अराजपत्रित) या पदावर ते रुजू होतील त्या दिनांकापासून, वेतनस्तर एस-१५ रुपये ४१,८००-१,३२,३०० या वेतनश्रेणीत, त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या महसूल विभागातील रिक्त पदावर तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे.

२. सोबतच्या **परिशिष्ट-अ** मधील उमेदवारांना महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदावर सरळसेवेने नियुक्तीसाठी महसूली विभागीय संरचना व विभागीय वाटप नियमावली, २०२१ लागू राहील. सदर नियमावलीतील तरतूदीनुसार संबंधित उमेदवारांना त्यांच्या नावासमोर नमूद केल्यानुसार महसूली विभाग वाटप करून, वाटप करण्यात आलेल्या महसूली विभागातील रिक्त पदावर सविस्तर पदस्थापना करण्यात येत आहे. त्यानुसार संबंधित उमेदवारांनी पदस्थापनेच्या ठिकाणी विहीत मुदतीत रुजू होणे बंधनकारक आहे.सदर उमेदवारांना देण्यात आलेल्या पदस्थापनेत कोणताही बदल होणार नाही.

३. नियुक्ती आदेश प्राप्त झाल्यानंतर उमेदवारांनी संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांच्याकडे हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत प्रत्यक्ष संपर्क साधावा व सेवेत रुजू व्हावे. अन्यथा, एक महिन्यानंतर सदर नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. संबंधित कार्यालय प्रमुखांनी एक महिन्यानंतर रुजू होणाऱ्या उमेदवारास रुजू करुन घेवू नये.

४. **परिशिष्ट-अ** मध्ये नमूद उमेदवारांची करण्यात आलेली नियुक्ती ही, सार्वजनिक बांधकाम विभागातील कनिष्ठ अभियंता (स्थापत्य), गट-ब (अराजपत्रित) या पदाच्या सेवाभरती नियमातील तरतुदीनुसार भरतीसाठी उपलब्ध असलेल्या रिक्त पदावर, खालील विहित अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे:-

१) एखाद्या उमेदवारास विहित कालावधीत अपरिहार्य, उचित कारणास्तव रुजू होण्यासाठी मुदतवाढ हवी असल्यास त्या उमेदवारांनी सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १० दिवसांच्या आत अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना मुदतवाढीसाठी अर्ज सादर करावा. तद्नंतर प्राप्त झालेले अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत. उचित कारणास्तव विहित कालावधीत मुदतवाढीसाठी अर्ज करणाऱ्या उमेदवारांना मुदतवाढ देण्याचा/ नाकारण्याचा अंतिम निर्णय शासनाचा राहील.

२) जे उमेदवार या शासन निर्णय निर्गमित झालेल्या तारखेपासून **एक महिन्याच्या मुदतीच्या आत** नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणार नाहीत अथवा त्यांचेकडून यासंबंधात काही सूचना प्राप्त झाली नाही तर ही नियुक्ती त्यांना स्वीकृत नाही असे समजून उमेदवारांच्या नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. तसेच, याबाबतचा अहवाल सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग/ सर्व अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी शासनाला दि.१३.०४.२०२४ पर्यंत सादर करावा.

३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग/सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळे, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी संबंधित उमेदवारास रुजू करुन घेतांना जाहीरातीत नमूद केल्यानुसार वयोमर्यादेची तसेच शैक्षणिक व अन्य अटींची पुर्तता करणारी मूळ कागदपत्रे (वय, अधिवास, शैक्षणिक पात्रता, महिला आरक्षणानुसार विहीत केलेले प्रमाणपत्र, जात वैधता प्रमाणपत्र, अनाथ प्रमाणपत्र, दिव्यांग प्रमाणपत्र इ.) तपासावीत.

४) सदर उमेदवारांची ज्येष्ठता ही सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २१.०६.२०२१ रोजीच्या शासन अधिसूचना अन्वये विनियमित केलेल्या महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियम, २०२१ मधील तरतुदीनुसार गुणवत्ता क्रमांकानुसार निश्चित करण्यात येईल. त्यामुळे नियुक्तीच्या आदेशानुसार एक महिन्याच्या आत सेवेत रुजू न होणाऱ्या उमेदवारांना सेवा ज्येष्ठता गमवावी लागेल व त्यांची ज्येष्ठता ते ज्या दिनांकास शासन सेवेत रुजू होतील, त्या दिनांकास निश्चित करण्यात येईल.

५) मागास प्रवर्गाच्या राखीव पदावर नियुक्त केलेल्या उमेदवारांची प्रचलित नियमातील तरतूदीनुसार जात वैधता प्रमाणपत्राच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येत आहे. मागासवर्गीय उमेदवारांनी जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र शासनास व संबंधित

उमेदवारांची नियुक्ती करण्यात आलेल्या कार्यालयास सादर करणे आवश्यक राहील. त्यानुसार संबंधित उमेदवारांच्या मुळ सेवापुस्तकात नोंद घेण्याची कार्यवाही संबंधित कार्यालय प्रमुखांनी करावी.

तसेच, मागास प्रवर्गाच्या राखीव पदावर (अ.जा.,अ.ज.,वि.जा.(अ),भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड), वि.मा.प्र., इ.मा.व.) नियुक्ती करण्यात आलेल्या मागासवर्गीय उमेदवारांनी जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नसल्यास, त्यांनी या आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या आत जात प्रमाणपत्राची वैधता, जात प्रमाणपत्र पडताळणी समितीकडून करुन घेणे आवश्यक राहील. नियुक्ती देण्यात आलेल्या कार्यालयाने संबंधित मागसवर्गीय उमेदवारांच्या जात वैधता प्रमाणपत्राच्या अनुषंगाने आवश्यक ती कागदपत्रे जात प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पाठविण्याची कार्यवाही करावी. विहित मुदतीत जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्यास संबंधित उमेदवारांच्या सेवा प्रचलित नियमानुसार समाप्त करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

६) अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती वगळता अन्य मागासप्रवर्गातील महिलांकरीता आरक्षित असलेल्या पदावरील निवडीसाठी दावा करु इच्छिणाऱ्या महिलांना त्या-त्या मागास प्रवर्गासांठी इतर मागासप्रवर्ग व बहुजन कल्याण विभाग तसेच सामान्य प्रशासन विभागाकडून वेळोवेळी विहीत करण्यात आल्याप्रमाणे नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे.

७) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय दिनांक २५.०५.२००१ मधील तरतुदीनुसार, मागास प्रवर्गातील महिलांसाठीच्या राखीव पदाकरीता निवड झालेल्या उमेदवारांनी, “महिलांसाठी उन्नत व प्रगत व्यक्ती गट (क्रिमीलेअर) यामध्ये मोडत नसल्याबाबतचे प्रमाणपत्र ” (अलिकडचे/ नवीनतम मूळ नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र) ची सांक्षाकित प्रत तपासणीसाठी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचेकडे पाठविणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने मागास प्रवर्गातील महिलांसाठीच्या राखीव पदाकरीता निवड झालेल्या महिला उमेदवारांचे नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र दोन प्रतीत शासनास पाठविण्याची कार्यवाही या आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत सर्व मुख्य अभियंता/ सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी करावी. मागास प्रवर्गातील महिलांसाठीच्या राखीव पदाकरीता निवड झालेल्या महिला उमेदवारांची नियुक्ती सदर तपासणी अहवालाच्या अधिन राहून करण्यात येत आहे. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचेकडून प्राप्त अहवालानुसार महिला उमेदवार अपात्र ठरत असल्यास त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

८) सदर उमेदवारांनी हिंदी व मराठी भाषा परीक्षा अगोदरच उत्तीर्ण केली नसेल किंवा सदर भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर यासंबंधी असलेल्या नियमानुसार त्यांना भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. भाषा परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास त्यांची वेतनवाढ प्रचलित नियमाप्रमाणे रोखून ठेवण्यात येईल.

९) या उमेदवारांपैकी खेळाडू प्रवर्गातून निवड झालेल्या उमेदवारांना शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, शासन निर्णय, दि.०१.०७.२०१६ मधील तरतुदीनुसार नियुक्ती देण्यात येत आहे. सदर तरतुदींची पूर्तता होत नसल्यास संबंधित उमेदवारांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

**१०)** सदर उमेदवारांना सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान), शासन पुरकपत्र क्रमांक मातंसं-२०१२/ प्र.क्र.२७७/३९, दि.०८.०१.२०१८ मधील परिच्छेद क्र.१.६ मधील तरतुदीनुसार संगणक अर्हता परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येत आहे.

**११)** या आदेशान्वये हजर होणा-या उमेदवारांना राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजना (NPS) लागू राहील. तथापि, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक : अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.१८/०८/२००९ मधील तरतुदीनूसार दि.०१/११/२००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचाऱ्यांनी त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि.०१/११/२००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि.०१/११/२००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल, तर अशा प्रकरणी शासन परीपत्रक, वित्त विभाग क्रमांक : अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२/०१/२००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधित शासकीय कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू राहील.

**१२)** सदर उमेदवारांनी कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) गट-ब (अराजपत्रित) या पदासाठी विहित केलेली व्यावसायिक परीक्षा विहित कालावधीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

**१३)** सदर उमेदवारांनी व्यावसायिक परीक्षा विहित कालावधीमध्ये उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. अभियंत्यांनी कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास तसेच, त्याचे काम किंवा वर्तणूक अयोग्य अथवा अनुरुप असमाधानकारक आढळल्यास, तो सेवेतून कमी करण्यास पात्र ठरेल.

**१४)** सदर उमेदवारांपैकी पूर्वी शासकीय सेवेत असणाऱ्या उमेदवारांची सरळसेवेने शासनाच्या दुसऱ्या पदावर नियुक्ती झाली असल्यास अशा उमेदवारांची कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) या पदावरील वेतननिश्चिती ही शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: वेतन-१२८९/प्र.क्र.२/९०/सेवा-३, दिनांक २३.०३.१९९४ मधील तरतुदीनुसार करण्यात यावी.

**१५)** तसेच सदर उमेदवारांपैकी पूर्वी शासकीय सेवेत नसणा-या उमेदवारांची सरळसेवेने शासनाच्या सेवेत नियुक्ती झाली असल्यास अशा उमेदवारांची कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) या पदावरील वेतन निश्चिती ही महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतूदीनुसार करण्यात यावी.

**१६)** सदर नियुक्ती, उमेदवारांनी सादर केलेल्या प्रमाणपत्राच्या सत्यासत्यतेवर अवलंबून राहील. उमेदवारांनी सादर केलेली प्रमाणपत्रे तसेच सांक्षाकन नमुन्यात नमूद केलेली माहिती, नियुक्तीनंतर खोटी अथवा बनावट आढळल्यास, सदर उमेदवारांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

**१७)** उमेदवारांनी साक्षांकन नमुन्यात सादर केलेली माहिती नियुक्ती देण्यात आल्यानंतर असत्य असल्याचे आढळून आल्यास तात्पुरते नियुक्ती आदेश रद्दबादल करुन भारतीय दंडसंहितेनुसार फौजदारी कारवाई करुन सदर उमेदवारांना शासन सेवेत कायमस्वरुपी अपात्र ठरविण्यात येईल.

**१८)** उमेदवारांच्या सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

१९) आवश्यकता भासल्यास उमेदवारांना भारताच्या संरक्षण सेवेतील पदावर किंवा भारताच्या संरक्षणाशी निगडीत असलेल्या कुठल्याही पदावर देशात किंवा परदेशात प्रशिक्षणाचा कालावधी धरुन चार वर्षापेक्षा कमी नसणाऱ्या कालावधीसाठी भारत सरकार ठरवेल त्या शर्तीवर सेवा करावी लागेल. परंतु,

(अ) त्यांच्या नियुक्तीनंतर १० वर्षांचा कालावधी संपल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही किंवा,

(ब) सर्वसाधारणपणे त्यांच्या वयाची ४० वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही.

२०) सदर उमेदवार सेवेत रुजू झाल्यानंतर सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असल्यास, त्याला शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही १०९२/१०३३/प्र.क्र.३३/ ९२/८, दिनांक ०२/१२/१९९७ मधील तरतुदीनुसार शासनाला किमान १ (एक) महिन्याची आगाऊ नोटीस किंवा एक महिन्याचे मूळ वेतन देणे आवश्यक राहील. मात्र, गैरशिस्त, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी वरीलप्रमाणे नोटीस देण्याचे बंधन शासनावर असणार नाही.

२१) या उमेदवारांना महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरणासंबंधी, सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दिनांक २३/०९/२०११ मधील परिच्छेद सहा येथील तरतुदीनुसार दिर्घ कालावधीचे व विदेशी प्रशिक्षणापूर्वी प्रशिक्षणार्थीला सक्षम प्राधिकाऱ्याबरोबर बंधपत्र लिहून द्यावे लागेल व त्याप्रमाणे नंतर प्रशिक्षणार्थी नोकरी सोडत असेल तर प्रशिक्षणावर खर्च झालेली रक्कम सदर प्रशिक्षणार्थीकडून वसूल करून संबंधित प्राधिकाऱ्याला शासनाकडे जमा करावी लागेल. याबाबतचे दर शासन निश्चित करेल.

२२) उपरोक्त वसूली केल्याशिवाय प्रशिक्षणार्थींचा राजीनामा क्षेत्रिय स्तरावरुन स्विकारण्यात येऊ नये. त्यानुसार प्रत्येक प्रशिक्षणार्थीला महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी (मेटा), नाशिक येथे रूजू होण्यापूर्वी मुख्य अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांच्याकडे व संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांकडे विहित बंधपत्र भरून सादर करणे बंधनकारक राहील.

२३) प्रशिक्षणादरम्यान सर्व प्रशिक्षणार्थीकडून प्रबोधिनीच्या प्रशिक्षणबाबतच्या नियमांचे व शिस्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. त्यांच्याकडून नियमभंग झाल्यास प्रबोधिनीकडून त्यांच्याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल.

२४) सर्व उमेदवारांचे वैद्यकीय तपासणी अहवाल प्राप्त होण्याच्या अधीन राहून त्यांची नियुक्ती करण्यात येत आहे. त्यानुसार, संबंधित उमेदवार यांनी त्यांच्या नियुक्तीच्या ठिकाणी रुजू झाल्यानंतर त्यांनी वैद्यकीय अहवाल त्यांना नियुक्ती देण्यात आलेल्या कार्यालयास सादर करावा.

२५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक चारित्र्य-२११७/ प्र.क्र.४८३/ २०१७/१६-अ, दिनांक २८/०८/२०१७ अन्वये सर्व उमेदवारांचे चारित्र्य पडताळणी अहवाल प्राप्त होण्याच्या अधीन राहून त्यांची नियुक्ती करण्यात येत आहे. त्यानुसार संबंधित उमेदवारांची त्यांच्या

नियुक्तीच्या ठिकाणी रुजू झाल्यानंतर त्या कार्यालयामार्फत त्यांची चारित्र्य पडताळणी करण्यात येईल.

२६) तसेच, जे उमेदवार यापूर्वी अन्य विभागात अथवा या विभागात शासकीय सेवेत कार्यरत होते त्यांच्याबाबतीत ते ज्या विभागात/कार्यालयात कार्यरत होते त्या विभागाकडून/कार्यालयाकडून त्यांच्या विरूध्द कोणती विभागीय चौकशी सुरू होती किंवा प्रस्तावित आहे. याबाबतची माहिती प्राप्त करून घेण्याच्या अधिन राहून त्यांना तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे. जर एखाद्या उमेदवारांविरूध्द त्यांनी यापूर्वी कार्यरत असलेल्या विभागात/कार्यालयात विभागीय चौकशी सुरू असल्यास सदर नियुक्तीनंतरही सदर चौकशी सुरू राहील.

२७) उमेदवार ज्या दिवशी रुजू होतील त्या दिवसापासून नियमाप्रमाणे त्यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यात यावेत व बदली झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्याकडे पाठवून विभाग प्रमुखांनी अथवा सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी याबाबत शासनास कळवावे.

२८) जर एखादा उमेदवार सध्या केंद्र/ राज्य शासनाच्या सेवेत अथवा निमशासकीय सेवेत कार्यरत असेल, तर संबंधीत नियंत्रण अधिकाऱ्यांनी त्यांना नेमणूकीच्या ठिकाणी हजर होण्याच्या दृष्टीने सदर सेवेतून कार्यमुक्त झाल्याचे अथवा तसे लेखी पत्र सादर केल्याशिवाय त्यांना रूजू करून घेता येणार नाही. तसेच सदर उमेदवारांची नियुक्ती ही त्यांचे केंद्र/ राज्य शासनाच्या सेवेत अथवा निमशासकीय सेवेतील ना-चौकशी प्रमाणपत्र त्यांच्या संबंधीत कार्यालयाकडून प्राप्त होण्याच्या अधीन राहील.

५. नियुक्ती देण्यात येत असलेल्या या उमेदवारांनी नियुक्तीच्या/पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता विशिष्ट ठिकाणी पदस्थापना /नियुक्ती मिळविण्यासाठी मा. लोकप्रतिनिधी/ खाजगी व्यक्ती किंवा संघटना यांचे मार्फत दडपण/ दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, संबंधित उमेदवारांविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील तरतुदींनुसार शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१३१४३४५३२०१८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINESH JAIPRAKASH BARHATE

Digitally signed by DINESH JAIPRAKASH BARHATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=d2b949400dcd69ca2cd572e2ab1676bbc50eab4961e4bf4b8a6fc3d8b242711e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=375B2A0B3D3C850685CDBDA7427B95DCF37C814A2A1DA11BFDA199A0B7C55447, cn=DINESH JAIPRAKASH BARHATE
Date: 2024.03.13 20:15:55 +05'30'

**( दि.ज. बऱ्हाटे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित उमेदवार (ई-मेलद्वारे) यांनी संबंधित मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, यांचे कार्यालयात हजर होण्याकरीता संपर्क साधावा.

**प्रत,**

१. महालेखापाल १/२, लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा महाराष्ट्र मुंबई/नागपूर ,
२. मा. मंत्री (सां.बा.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. अपर मुख्य सचिव (सा.बां.वि.), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. सचिव (बांधकामे/रस्ते), यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.
६. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ.
७. सह सचिव (सेवा/संनि), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
८. कार्यासन [आस्थापना-१/आस्थापना-३/सेवा-२], सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती, सेवा-३.

| शासन आदेश क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१६७/सेवा-३, दि.१३.०३.२०२४ सोबतचे परिशिष्ट-अ | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | गुणवत्ता यादी क्रमांक | उमेदवाराचे नाव | उमेदवाराचा मूळ प्रवर्ग | निवडीचा प्रवर्ग | वाटप करावयाचा महसुली विभाग | पदस्थापना |
| १ | १ | ABHIJEET RAJKUMAR LOKARE<br>अभिजीत राजकुमार लोकरे | आ.दु.घ | खुला-सामान्य | **पुणे** | सा.बां.मंडळ, सोलापूर अंतर्गत सा.बां.उपविभाग, करमाळा येथील रिक्त पदी |
| २ | २ | ROHAN DAYANAND JADHAV<br>रोहन दयानंद जाधव | खुला | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | दक्षता व गुणनियंत्रण मंडळ कार्यालय, छत्रपती संभाजीनगर येथील रिक्त पदी |
| ३ | ३ | AJAY SHIVAJI PATIL<br>अजय शिवाजी पाटील | खुला | खुला-सामान्य | **कोकण-२** | सा.बां. मंडळ, मुंबई कार्यालय येथील रिक्त पदी |
| ४ | ४ | SACHIN SUNIL NAIR<br>सचिन सुनिल नायर | खुला | खुला-सामान्य | **पुणे** | सा.बां.मंडळ, पुणे अंतर्गत सा.बां.(दक्षिण) विभाग कार्यालय, पुणे येथील रिक्त पदी |
| ५ | ५ | SAHIL PRAKASH LONDE<br>साहिल प्रकाश लोंढे | इ.मा.व. | खुला-सामान्य | **अमरावती** | दक्षता व गुणनियंत्रण मंडळ कार्यालय, अमरावती येथील रिक्त पदी |
| ६ | ६ | PRASHANT MANIK GHUTUKADE<br>प्रशांत माणिक घुटुकडे | भ.ज.(क) | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | सा.बां.मंडळ, लातूर अंतर्गत सा.बां.उपविभाग क्र.१, निलंगा येथील रिक्त पदी |
| ७ | ७ | RAJVARDHAN RAGHUNATH PATIL<br>राजवर्धन रघुनाथ पाटील | खुला | खुला-सामान्य | **पुणे** | सा.बां.मंडळ, कोल्हापूर अंतर्गत सा.बां.(दक्षिण) विभाग कार्यालय, कोल्हापूर येथील रिक्त पदी |
| ८ | ८ | MORESHWAR HEMANT PATIL<br>मोरेश्वर हेमंत पाटील | इ.मा.व. | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, धुळे अंतर्गत सा.बां.उपविभाग, नवापूर येथील रिक्त पदी |
| ९ | ९ | MOHAMMAD ZULKARNAIN FAHIMUDDIN<br>मोहम्मद जुल्करनैन फहिमोद्दीन | खुला | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | सा.बां.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत सा.बां.पश्चिम विभाग, छत्रपती संभाजीनगर येथील रिक्त पदी |
| १० | १० | VISMIT VITHU BANDGAR<br>विस्मित विठू बंडगर | भ.ज.(क) | खुला-सामान्य | **पुणे** | सा.बां.मंडळ, कोल्हापूर अंतर्गत सा.बां.उपविभाग, आजरा येथील रिक्त पदी |
| ११ | ११ | ANIKET VIJAYRAO DHAGE<br>अनिकेत विजयराव ढगे | भ.ज.(क) | खुला-सामान्य | **अमरावती** | सा.बां.मंडळ, अमरावती अंतर्गत सा.बां. उपविभाग क्र.१, धारणी येथील रिक्त पदी |
| १२ | १२ | VAIBHAV PRABHAKAR BADGUJAR<br>वैभव प्रभाकर बडगुजर | इ.मा.व. | खुला-सामान्य | **कोकण-२** | दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, कोकण भवन, नवी मुंबई येथील रिक्त पदी |
| १३ | १३ | YOGESHWAR PRABHAKAR KADAM<br>योगेश्वर प्रभाकर कदम | आ.दु.घ | खुला-सामान्य | **पुणे** | सा.बां.मंडळ, कोल्हापूर अंतर्गत विशेष प्रकल्प सा.बां. विभाग कार्यालय, कोल्हापूर येथील रिक्त पदी |
| १४ | १४ | PRAKASH DINKAR BARKALE<br>प्रकाश दिनकर बरकाळे | खुला | खुला-सामान्य | **पुणे** | सा.बां.मंडळ, कोल्हापूर अंतर्गत सा.बां. विभाग, मिरज येथील रिक्त पदी |
| १५ | १५ | DIPAK RAMESHWAR ARU<br>दिपक रामेश्वर आरु | इ.मा.व. | खुला-सामान्य | **अमरावती** | सा.बां.मंडळ, अमरावती अंतर्गत सा.बां.उपविभाग, दर्यापूर येथील रिक्त पदी |
| १६ | १६ | ADINATH NAMADEW SANAP<br>आदिनाथ नामदेव सानप | भ.ज.(ड) | खुला-सामान्य | **अमरावती** | सा.बां.मंडळ, अमरावती अंतर्गत सा.बां.उपविभाग, अंजनगाव सुर्जी येथील रिक्त पदी |
| १७ | १७ | CHETAN CHUDAMAN DESALE<br>चेतन चुडामण देसले | इ.मा.व. | खुला-सामान्य | **कोकण-२** | सा.बां. मंडळ, ठाणे अंतर्गत सा.बां. उपविभाग क्र.५, ठाणे येथील रिक्त पदी |

| अ.क्र. | गुणवत्ता यादी क्रमांक | उमेदवाराचे नाव | उमेदवाराचा मूळ प्रवर्ग | निवडीचा प्रवर्ग | वाटप करावयाचा महसुली विभाग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|---|
| १८ | १८ | RAJAT ASHOK ATUGADE<br>रजत अशोक आटुगडे | आ.दु.घ | खुला-सामान्य | **पुणे** | सा.बां.मंडळ, कोल्हापूर अंतर्गत सा.बां.उपविभाग, कवठेमहांकाळ येथील रिक्त पदी |
| १९ | १९ | TEJAS ULHAS DESHMUKH<br>तेजस उल्हास देशमुख | इ.मा.व. | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बा.मंडळ, नाशिक अंतर्गत सा.बां. विभाग कार्यालय, मालेगाव येथील रिक्त पदी. |
| २० | २० | SAMADHAN HARISHCHANDRA KASHID<br>समाधान हरिश्चंद्र काशिद | इ.मा.व. | खुला-सामान्य | **पुणे** | सा.बां.मंडळ, सोलापूर अंतर्गत सा.बां. विभाग क्र.२, सोलापूर येथील रिक्त पदी |
| २१ | २१ | AKSHAY DHONDIRAM CHOBHE<br>अक्षय धोंडीराम चोभे | आ.दु.घ | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, अहमदनगर अंतर्गत बांधकाम उपविभाग, अहमदनगर येथील रिक्त पदी. |
| २२ | २२ | AKSHAY LAHU MANE<br>अक्षय लहू माने | खुला | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | सा.बां.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत सा.बां.उपविभाग,गंगापूर येथील रिक्त पदी |
| २३ | २३ | SAURABH RAJENDRA BIRHADE<br>सौरभ राजेंद्र बिऱ्हाडे | अ.जा. | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, धुळे कार्यालय येथील रिक्त पदी. |
| २४ | २४ | AKSHAY YASHWANT CHAUDHARI<br>अक्षय यशवंत चौधरी | इ.मा.व. | खुला-सामान्य | **कोकण-२** | सा.बां. मंडळ, मुंबई अंतर्गत सा.बां. वांद्रे उपविभाग क्र.१ येथील रिक्त पदी |
| २५ | २५ | ARBAJ FAKRUDDIN KHAN<br>अरबाज फकरुद्दीन खान | इ.मा.व. | खुला-सामान्य | **नागपूर** | सा.बां.मंडळ, नागपूर येथील रिक्त पदी |
| २६ | २६ | SURAJ GANGADHAR GOLEKAR<br>सूरज गंगाधर गोळेकर | भ.ज.(क) | खुला-सामान्य | **अमरावती** | सा.बां.मंडळ, अमरावती अंतर्गत सा.बां.उपविभाग क्र.५, दर्यापूर येथील रिक्त पदी |
| २७ | २७ | HARSHAVARDHAN PRADEEP SABALE<br>हर्षवर्धन प्रदीप साबळे | आ.दु.घ | खुला-सामान्य | **पुणे** | सा.बां.मंडळ, सातारा अंतर्गत सा.बां.(दक्षिण) उपविभाग, पाटण येथील रिक्त पदी |
| २८ | २८ | SHUBHAM UTTAMRAO BARKALE<br>शुभम उत्तमराव बरकले | इ.मा.व. | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, धुळे अंतर्गत सा.बां. विभाग कार्यालय, धुळे येथील रिक्त पदी. |
| २९ | २९ | SAGAR ARJUN GANGURDE<br>सागर अर्जुन गांगुर्डे | खुला | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, नाशिक अंतर्गत सा.बां.उपविभाग, चांदवड येथील रिक्त पदी. |
| ३० | ३० | ROHIT RAMCHANDRA PATIL<br>रोहित रामचंद्र पाटील | आ.दु.घ | खुला-सामान्य | **पुणे** | सा.बां.मंडळ, कोल्हापूर अंतर्गत सा.बां.उपविभाग, विटा येथील रिक्त पदी |
| ३१ | ३१ | SHUBHAM ASHOK CHAUDHARI<br>शुभम अशोक चौधरी | इ.मा.व. | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां. मंडळ, नाशिक अंतर्गत सा.बां.(आदिवासी) विभाग कार्यालय, नाशिक येथील रिक्त पदी. |
| ३२ | ३२ | ROHIT . DHONDGE<br>रोहित धोंडगे | खुला | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | सा.बां.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत सा.बां. उपविभाग, पूर्व कन्नड येथील रिक्त पदी |
| ३३ | ३३ | NAGESH MADHUKARRAO KUKADE<br>नागेश मधुकरराव कुकडे | भ.ज.(क) | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | सा.बां.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत सा.बां.उपविभाग (वि.प्र.),गंगापूर येथील रिक्त पदी |
| ३४ | ३४ | MAYURESH KIRAN MORE<br>मयुरेश किरण मोरे | आ.दु.घ | खुला-सामान्य | **पुणे** | सा.बां.मंडळ, सातारा अंतर्गत सा.बां.उपविभाग, कोरेगाव येथील रिक्त पदी |
| ३५ | ३५ | ROHIT CHANAGONDA PATIL<br>रोहित चनगोंडा पाटील | आ.दु.घ | खुला-सामान्य | **पुणे** | सा.बां.मंडळ, सातारा अंतर्गत सा.बां.उपविभाग, दहिवडी येथील रिक्त पदी |

| अ.क्र. | गुणवत्ता यादी क्रमांक | उमेदवाराचे नाव | उमेदवाराचा मूळ प्रवर्ग | निवडीचा प्रवर्ग | वाटप करावयाचा महसुली विभाग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|---|
| ३६ | ३६ | DNYANESHWAR TANAJI SAWANT<br>ज्ञानेश्वर तानाजी सावंत | आ.दु.घ | खुला-सामान्य | **पुणे** | सा.बां.मंडळ, सातारा अंतर्गत सा.बां.उपविभाग, वाई येथील रिक्त पदी |
| ३७ | ३७ | SUMEET AVINASH GUPTE<br>सुमीत अविनाश गुप्ते | खुला | खुला-सामान्य | **कोकण-२** | सा.बां. मंडळ, मुंबई अंतर्गत सा.बां. वांद्रे उपविभाग क्र.२ येथील रिक्त पदी |
| ३८ | ३८ | AVINASH RAMRAO CHANDAR<br>अविनाश रामराव चांदर | आ.दु.घ | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, धुळे अंतर्गत सा.बां.उपविभाग, धुळे येथील रिक्त पदी. |
| ३९ | ३९ | AMBANA SHRIMANT GUDODAGI<br>अंबाना श्रीमंत गुडोडगी | इ.मा.व. | खुला-सामान्य | **पुणे** | सा.बां.मंडळ, सोलापूर अंतर्गत सा.बां.(रो.ह.यो.) उपविभाग, पंढरपूर येथील रिक्त पदी |
| ४० | ४० | SUSHIL BABASAHEB INGOLE<br>सुशिल बाबासाहेब इंगोले | अ.जा. | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | सा.बां.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत जागतिक बँक प्रकल्प विभाग, छत्रपती संभाजीनगर येथील रिक्त पदी |
| ४१ | ४१ | SHIVANI SANTOSH ITRAJ<br>शिवानी संतोष इतराज | खुला | खुला-महिला | **कोकण-२** | सा.बां. मंडळ, मुंबई अंतर्गत इमारती बांधकाम विभाग कार्यालय, मुलुंड येथील रिक्त पदी |
| ४२ | ४२ | KESHAV MAHADEV KHANDEKAR<br>केशव महादेव खांडेकर | भ.ज.(क) | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | सा.बां.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत सा.बां. विभाग, जालना येथील रिक्त पदी |
| ४३ | ४३ | RATAN ASARAM CHANDWADE<br>रतन आसाराम चंदवाडे | वि.जा.(अ) | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | सा.बां.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत सा.बां. विभाग, जालना येथील रिक्त पदी |
| ४४ | ४४ | ROHIT SATYAWAN LUBAL<br>रोहित सत्यवान लुबाळ | भ.ज.(क) | खुला-सामान्य | **कोकण-२** | सा.बां. मंडळ, मुंबई अंतर्गत इमारती बांधकाम उपविभाग क्र.१, मुलुंड येथील रिक्त पदी |
| ४५ | ४५ | SANDESH RAJENDRA POWAR<br>संदेश राजेंद्र पोवार | खुला | खुला-सामान्य | **नागपूर** | संकल्पचित्र मंडळ, कोकण भवन, नवी मुंबई अंतर्गत संकल्पचित्र विभाग (पूल), नागपूर येथील रिक्त पदी |
| ४६ | ४६ | SHRAWAN KHARARI CHOUDHARY<br>श्रवण खरारी चौधरी | खुला | खुला-सामान्य | **नागपूर** | सा.बां.मंडळ, नागपूर येथील रिक्त पदी |
| ४७ | ४७ | RAJESH DEEPAK PARADE<br>राजेश दीपक परडे | वि.मा.प्र. | खुला-सामान्य | **कोकण-१** | सा.बां.मंडळ, रत्नागिरी अंतर्गत सा.बां.उपविभाग क्र.१, कणकवली येथील रिक्त पदी |
| ४८ | ४८ | DNYANESHWAR SOPAN KALE<br>ज्ञानेश्वर सोपान काळे | भ.ज.(क) | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | सा.बां.मंडळ, धाराशिव अंतर्गत रा.म.उपविभाग, तुळजापूर (मुख्यालय धाराशिव) येथील रिक्त पदी |
| ४९ | ४९ | MAYUR PURUSHOTTAM MAHALLE<br>मयूर पुरुषोत्तम महल्ले | इ.मा.व. | खुला-सामान्य | **अमरावती** | सा.बां.मंडळ, अकोला येथील रिक्त पदी |
| ५० | ५० | KARANSINGHA KERABA PATIL<br>करणसिंह केरबा पाटील | आ.दु.घ | खुला-सामान्य | **कोकण-१** | सा.बां.मंडळ, रत्नागिरी अंतर्गत सा.बां.उपविभाग क्र.१, कणकवली येथील रिक्त पदी |
| ५१ | ५१ | DHANANJAY PANDIT KAKUSTE<br>धनंजय पंडित काकुस्ते | इ.मा.व. | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, धुळे अंतर्गत सा.बां.उपविभाग, साक्री येथील रिक्त पदी. |
| ५२ | ५२ | RUPESH SUDHAKAR DESHMUKH<br>रुपेश सुधाकर देशमुख | आ.दु.घ | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | सा.बां.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत सा.बां. उपविभाग, भोकरदन येथील रिक्त पदी |

| अ.क्र. | गुणवत्ता यादी क्रमांक | उमेदवाराचे नाव | उमेदवाराचा मूळ प्रवर्ग | निवडीचा प्रवर्ग | वाटप करावयाचा महसुली विभाग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|---|
| ५३ | ५३ | SHIVSHANKAR LILADHAR GADDAMWAR<br>शिवशंकर लिलाधर गड्डमवार | वि.मा.प्र. | खुला-सामान्य | **नागपूर** | सा.बां.मंडळ, नागपूर अंतर्गत सा.बां.विभाग क्र.१, नागपूर येथील रिक्त पदी |
| ५४ | ५४ | VIRAJ VIJAYKUMAR SADAWARTE<br>विराज विजयकुमार सदावर्ते | आ.दु.घ | खुला-सामान्य | **अमरावती** | सा.बां.मंडळ, अकोला अंतर्गत सा.बां.उपविभाग क्र.१, अकोला येथील रिक्त पदी |
| ५५ | ५५ | VISHAL MOHAN RATHOD<br>विशाल मोहन राठोड | वि.जा.(अ) | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | सा.बां.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत सा.बां. उपविभाग, बदनापूर येथील रिक्त पदी |
| ५६ | ५६ | SUSHANT DADASAHEB KHEDEKAR<br>सुशांत दादासाहेब खेडेकर | आ.दु.घ | खुला-सामान्य | **कोकण-१** | सा.बां.मंडळ, रत्नागिरी अंतर्गत सा.बां.विभाग कार्यालय, कणकवली येथील रिक्त पदी |
| ५७ | ५७ | MAHESH JANARDAN HADKE<br>महेश जनार्दन हाडके | इ.मा.व. | खुला-सामान्य | **नागपूर** | सा.बां.मंडळ, नागपूर अंतर्गत सा.बां.विभाग क्र.१, नागपूर येथील रिक्त पदी |
| ५८ | ५८ | PRATHAMESH SHAM THETE<br>प्रथमेश शाम थेटे | इ.मा.व. | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, धुळे अंतर्गत सा.बां.उपविभाग, साक्री येथील रिक्त पदी. |
| ५९ | ५९ | AJIT HANAMANT PISAL<br>अजित हणमंत पिसाळ | आ.दु.घ | खुला-सामान्य | **कोकण-२** | सा.बां. मंडळ, मुंबई अंतर्गत इमारती बांधकाम उपविभाग क्र.१, मुलुंड येथील रिक्त पदी |
| ६० | ६० | ROSHAN SUNIL BHAGAT<br>रोशन सुनिल भगत | अ.जा. | खुला-सामान्य | **कोकण-२** | सा.बां. मंडळ, मुंबई अंतर्गत इमारती बांधकाम उपविभाग क्र.३, मुलुंड येथील रिक्त पदी |
| ६१ | ६१ | ANIKET ANANDA SHINDE<br>अनिकेत आनंदा शिंदे | इ.मा.व. | खुला-सामान्य | **कोकण-२** | सा.बां. मंडळ, मुंबई अंतर्गत इमारती बांधकाम उपविभाग क्र.३, मुलुंड येथील रिक्त पदी |
| ६२ | ६२ | SAMRUDDHI SANJAY RAKSHE<br>समृद्धी संजय राक्षे | इ.मा.व. | खुला-महिला | **कोकण-२** | सा.बां. मंडळ, मुंबई अंतर्गत इमारती बांधकाम उपविभाग क्र.३, मुलुंड येथील रिक्त पदी |
| ६३ | ६३ | CHETAN SANJAY THORAT<br>चेतन संजय थोरात | अ.जा. | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, धुळे अंतर्गत सा.बां.उपविभाग, शिंदखेडा येथील रिक्त पदी. |
| ६४ | ६४ | SHANTANU NAGESH PATIL<br>शंतनू नागेश पाटील | आ.दु.घ | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | सा.बां.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत सा.बां. उपविभाग क्र.३, जालना येथील रिक्त पदी |
| ६५ | ६५ | AKSHAY VILAS KHAIRNAR<br>अक्षय विलास खैरनार | आ.दु.घ | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, धुळे अंतर्गत सा.बां.उपविभाग, शिंदखेडा येथील रिक्त पदी. |
| ६६ | ६६ | SHRINIVAS SHANKARRAO GONEWAR<br>श्रीनिवास शंकरराव गोणेवार | वि.मा.प्र. | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | सा.बां.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत सा.बां. उपविभाग, भोकरदन येथील रिक्त पदी |
| ६७ | ६७ | KETAN CHANDRAKANT KADAM<br>केतन चंद्रकांत कदम | आ.दु.घ | खुला-सामान्य | **नागपूर** | दक्षता व गुणनियंत्रण मंडळ कार्यालय, नागपूर येथील रिक्त पदी |
| ६८ | ६८ | AKSHAY BHARAT GAYKE<br>अक्षय भरत गायके | इ.मा.व. | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, धुळे अंतर्गत सा.बां. विभाग कार्यालय, शहादा येथील रिक्त पदी. |
| ६९ | ६९ | PRATHAMESH UMESH CHAVAN<br>प्रथमेश उमेश चव्हाण | आ.दु.घ | खुला-सामान्य | **कोकण-१** | सा.बां.मंडळ, रत्नागिरी अंतर्गत सा.बां.उपविभाग, दापोली येथील रिक्त पदी |

| अ.क्र. | गुणवत्ता यादी क्रमांक | उमेदवाराचे नाव | उमेदवाराचा मूळ प्रवर्ग | निवडीचा प्रवर्ग | वाटप करावयाचा महसुली विभाग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|---|
| ७० | ७० | KESHAV UMANATH PANDEY<br>केशव उमानाथ पांडे | खुला | खुला-सामान्य | **कोकण-२** | सा.बां. मंडळ, मुंबई अंतर्गत इमारती बांधकाम उपविभाग क्र.४, मुलुंड येथील रिक्त पदी |
| ७१ | ७१ | TUSHAR SATISH CHAUDHARI<br>तुषार सतिश चौधरी | वि.जा.(अ) | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, धुळे अंतर्गत सा.बां. विभाग कार्यालय, शहादा येथील रिक्त पदी. |
| ७२ | ७२ | ASHISH RAJKUMAR MAHURE<br>आशिष राजकुमार माहुरे | इ.मा.व. | खुला-सामान्य | **नागपूर** | दक्षता व गुणनियंत्रण मंडळ कार्यालय, नागपूर येथील रिक्त पदी |
| ७३ | ७३ | NIRAJ UTTAM POTAWADE<br>निरज उत्तम पोटवडे | इ.मा.व. | खुला-सामान्य | **कोकण-२** | सा.बां. मंडळ, मुंबई अंतर्गत इमारती बांधकाम विभाग कार्यालय, मुलुंड येथील रिक्त पदी |
| ७४ | ७४ | MANOJ SHASHIKANT KEDAR<br>मनोज शशिकांत केदार | आ.दु.घ | खुला-सामान्य | **कोकण-२** | सा.बां. मंडळ, रायगड अंतर्गत सा.बां. उपविभाग उरण येथील रिक्त पदी |
| ७५ | ७५ | PRATEEK VISHWANATH MENDHE<br>प्रतिक विश्वनाथ मेंढे | अ.जा. | खुला-सामान्य | **नागपूर** | दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नागपूर अंतर्गत प्रादेशिक प्रयोगशाळा, नागपूर येथील रिक्त पदी |
| ७६ | ७६ | RAHUL SUNIL PANDEY<br>राहुल सुनिल पांडे | आ.दु.घ | खुला-सामान्य | **कोकण-२** | मुंबई बांधकाम मंडळ, चेंबूर अंतर्गत मुंबई रस्ते बांधकाम उपविभाग क्र.९, कुर्ला येथील रिक्त पदी |
| ७७ | ७७ | ONKAR VITTHAL WAGH<br>ओंकार विठ्ठल वाघ | खुला | खुला-सामान्य | **कोकण-१** | सा.बां.मंडळ, रत्नागिरी अंतर्गत सा.बां.उपविभाग, दापोली येथील रिक्त पदी |
| ७८ | ७८ | VICKY VITTHAL PALANGE<br>विकी विठ्ठल पलंगे | खुला | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, धुळे अंतर्गत सा.बां.उपविभाग, शहादा येथील रिक्त पदी. |
| ७९ | ७९ | YOGESH PRAKASH TAMBAT<br>योगेश प्रकाश तांबट | इ.मा.व. | खुला-सामान्य | **कोकण-१** | सा.बां.मंडळ, रत्नागिरी अंतर्गत सा.बां.उपविभाग, मंडणगड येथील रिक्त पदी |
| ८० | ८० | TANUJ NARENDRA NARAD<br>तनुज नरेंद्र नरड | इ.मा.व. | खुला-सामान्य | **नागपूर** | सा.बां.मंडळ, नागपूर अंतर्गत सा.बां.उपविभाग, नरखेड येथील रिक्त पदी |
| ८१ | ८१ | SURAJ KISHOR POKALE<br>सुरज किशोर पोकळे | इ.मा.व. | खुला-सामान्य | **अमरावती** | सा.बां.मंडळ, अकोला अंतर्गत सा.बां.उपविभाग क्र.१, अकोला येथील रिक्त पदी |
| ८२ | ८२ | SHAILESH CHAVGONDA PATIL<br>शैलेश चवगोंडा पाटील | आ.दु.घ | खुला-सामान्य | **कोकण-१** | सा.बां.मंडळ, रत्नागिरी अंतर्गत सा.बां.उपविभाग, गुहागर येथील रिक्त पदी |
| ८३ | ८३ | VIPUL LALITKUMAR BHIMJIYANI<br>विपुल ललितकुमार भिमजियाणी | आ.दु.घ | खुला-सामान्य | **अमरावती** | सा.बां.मंडळ, अमरावती अंतर्गत सा.बां. उपविभाग क्र.१, अमरावती येथील रिक्त पदी |
| ८४ | ८४ | SATYAM HANUMANTRAO SANGANWAR<br>सत्यम हनुमंतराव संगनवार | आ.दु.घ | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | सा.बां.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत सा.बां. उपविभाग, भोकरदन येथील रिक्त पदी |
| ८५ | ८५ | SATYAM SHYAM WAGHMARE<br>सत्यम श्याम वाघमारे | अ.जा. | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | सा.बां.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत सा.बां.विभाग क्र.२, जालना येथील रिक्त पदी |
| ८६ | ८६ | CHETAN SURESH RAUT<br>चेतन सुरेश राऊत | इ.मा.व. | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, धुळे अंतर्गत सा.बां.उपविभाग, अक्कलकुवा येथील रिक्त पदी. |
| ८७ | ८७ | JAYANT ANKUSH GADADE<br>जयंत अंकुश गडदे | भ.ज.(क) | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, अहमदनगर अंतर्गत सा.बां.उपविभाग, कोपरगाव येथील रिक्त पदी. |

| अ.क्र. | गुणवत्ता यादी क्रमांक | उमेदवाराचे नाव | उमेदवाराचा मूळ प्रवर्ग | निवडीचा प्रवर्ग | वाटप करावयाचा महसुली विभाग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|---|
| ८८ | ८८ | SHUBHAM ANANDLAL JAISWAL<br>शुभम आनंदलाल जैस्वाल | इ.मा.व. | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | सा.बां.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत सा.बां. उपविभाग, परतूर येथील रिक्त पदी |
| ८९ | ८९ | MAHESH TULSHIRAM JANGLE<br>महेश तुळशीराम जंगले | भ.ज.(क) | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | सा.बां.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत सा.बां. उपविभाग क्र.५, जालना येथील रिक्त पदी |
| ९० | ९० | CHETAN ANIL DHABALE<br>चेतन अनिल ढबाले | इ.मा.व. | खुला-सामान्य | **नागपूर** | सा.बां.मंडळ, नागपूर अंतर्गत मेयो सामान्य रुग्णालय (सा.बां.) उपविभाग, नागपूर येथील रिक्त पदी |
| ९१ | ९१ | ABHINAV RAJARAM AVHAD<br>अभिनव राजाराम आव्हाड | भ.ज.(ड) | खुला-सामान्य | **कोकण-२** | मुंबई बांधकाम मंडळ, चेंबूर अंतर्गत बहुमजली इमारती बांधकाम उपविभाग क्र.३, बांद्रा येथील रिक्त पदी |
| ९२ | ९२ | YOGESH BABURAO NELWADE<br>योगेश बाबुराव नेलवाडे | खुला | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | रा.म.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत रा.म.उपविभाग, गेवराई येथील रिक्त पदी |
| ९३ | ९३ | DEEPAK BHAGAWAN PAWAR<br>दीपक भगवान पवार | आ.दु.घ | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | रा.म.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत रा.म.उपविभाग, गेवराई येथील रिक्त पदी |
| ९४ | ९४ | SWAPNIL UMAKANT BIRARIS<br>स्वप्निल उमाकांत बिरारीस | इ.मा.व. | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, धुळे अंतर्गत सा.बां.उपविभाग क्र.१, धडगाव येथील रिक्त पदी |
| ९५ | ९५ | PALASH SANJAY BHOYAR<br>पलाश संजय भोयर | इ.मा.व. | खुला-सामान्य | **अमरावती** | सा.बां.मंडळ, अकोला अंतर्गत सा.बां.उपविभाग क्र.२, अकोला येथील रिक्त पदी |
| ९६ | ९६ | AKSHAY RAMRAO ADSUL<br>अक्षय रामराव अडसुळ | इ.मा.व. | खुला-सामान्य | **कोकण-२** | सा.बां. मंडळ, ठाणे अंतर्गत सा.बां. उपविभाग, भिंगारी येथील रिक्त पदी |
| ९७ | ९७ | ARATI LAXMAN SANAP<br>आरती लक्ष्मण सानप | भ.ज.(ड) | खुला-महिला | **कोकण-२** | मुंबई बांधकाम मंडळ, चेंबूर अंतर्गत सा.बां.विशेष प्रकल्प विभाग, आरे, गोरेगाव विभाग कार्यालय येथील रिक्त पदी |
| ९८ | ९८ | AMOL ASHOK GHUGE<br>अमोल अशोक घुगे | भ.ज.(ड) | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ,धुळे अंतर्गत सा.बां.उपविभाग क्र.२, धडगांव येथील रिक्त पदी. |
| ९९ | ९९ | MITALEE VINAYAK AYACHIT<br>मिताली विनायक अयाचित | आ.दु.घ | खुला-महिला | **छत्रपती संभाजीनगर** | रा.म.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत रा.म.उपविभाग, माजलगाव येथील रिक्त पदी |
| १०० | १०० | VEDVATEE PRAMOD HAJGUDE<br>वेदवती प्रमोद हाजगुडे | आ.दु.घ | खुला-महिला | **छत्रपती संभाजीनगर** | रा.म.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत रा.म.उपविभाग, सिल्लोड येथील रिक्त पदी |
| १०१ | १०१ | PURUSHOTTAM PRAKASH MEDAR<br>पुरुषोत्तम प्रकाश मेदार | खुला | खुला-सामान्य | **कोकण-१** | सा.बां.मंडळ, रत्नागिरी अंतर्गत सा.बां.उपविभाग, गुहागर येथील रिक्त पदी |
| १०२ | १०२ | UDAY KAILAS PATIL<br>उदय कैलास पाटील | इ.मा.व. | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ,धुळे अंतर्गत सा.बां.उपविभाग क्र.२, धडगांव येथील रिक्त पदी. |
| १०३ | १०३ | ROHIT SHRIKISHAN KAWALE<br>रोहित श्रीकिशन कावळे | अ.जा. | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | रा.म.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत रा.म.उपविभाग, सिल्लोड येथील रिक्त पदी |
| १०४ | १०५ | MAYUR PRABHAKARRAO BHAGWAT<br>मयूर प्रभाकरराव भागवत | इ.मा.व. | खुला-सामान्य | **अमरावती** | सा.बां.मंडळ, अकोला अंतर्गत जागतिक बँक प्रकल्प विभाग, अकोला येथील रिक्त पदी |
| १०५ | १०६ | RUSHIKESH BABAJI AWATE<br>ऋषिकेश बाबाजी आवटे | इ.मा.व. | खुला-सामान्य | **कोकण-२** | मुंबई बांधकाम मंडळ, चेंबूर अंतर्गत कृषि बांधकाम उपविभाग क्र.१, आरे, गोरेगाव, मुंबई येथील रिक्त पदी |

| अ.क्र. | गुणवत्ता यादी क्रमांक | उमेदवाराचे नाव | उमेदवाराचा मूळ प्रवर्ग | निवडीचा प्रवर्ग | वाटप करावयाचा महसुली विभाग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|---|
| १०६ | १०७ | SUSHANT SHRIKANT KULKARNI<br>सुशांत श्रीकांत कुलकर्णी | खुला | खुला-सामान्य | **कोकण-१** | सा.बां.मंडळ, रत्नागिरी अंतर्गत सा.बां.उपविभाग, खेड येथील रिक्त पदी |
| १०७ | १०८ | SAIRAJ SATYAWAN PAWAR<br>साईराज सत्यवान पवार | आ.दु.घ | खुला-सामान्य | **कोकण-२** | मुंबई बांधकाम मंडळ, चेंबूर अंतर्गत कृषि बांधकाम उपविभाग क्र.१३, आरे, गोरेगाव, मुंबई येथील रिक्त पदी |
| १०८ | १०९ | SAGAR DATTATRAY SARGAR<br>सागर दत्तात्रय सरगर | भ.ज.(क) | खुला-सामान्य | **कोकण-१** | सा.बां.मंडळ, रत्नागिरी अंतर्गत सा.बां.उपविभाग, लांजा येथील रिक्त पदी |
| १०९ | ११० | ADITYA SHRINIVAS TATTE<br>आदित्य श्रीनिवास तट्टे | इ.मा.व. | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | रा.म.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत रा.म.उपविभाग, वैजापूर येथील रिक्त पदी |
| ११० | १११ | AKASH GAUTAMRAOJI CHARBHE<br>आकाश गौतमरावजी चारभे | अ.जा. | खुला-सामान्य | **नागपूर** | सा.बां.मंडळ, नागपूर अंतर्गत सा.बां.उपविभाग क्र.७, नागपूर येथील रिक्त पदी |
| १११ | ११२ | ABHAY ANNASAHEB MUNDE<br>अभय अण्णासाहेब मुंडे | भ.ज.(ड) | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | रा.म.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत रा.म.विभाग, जालना येथील रिक्त पदी |
| ११२ | ११३ | GANESHKUMAR SHRIKRUSHNA KHARAT<br>गणेशकुमार श्रीकृष्ण खरात | इ.मा.व. | खुला-सामान्य | **अमरावती** | सा.बां.मंडळ, अकोला अंतर्गत जागतिक बँक प्रकल्प विभाग, अकोला येथील रिक्त पदी |
| ११३ | ११४ | BHUSHAN SHRIKANT KANADE<br>भूषण श्रीकांत कानडे | इ.मा.व. | खुला-सामान्य | **नागपूर** | सा.बां.मंडळ, नागपूर अंतर्गत सा.बां.उपविभाग क्र.५, नागपूर येथील रिक्त पदी |
| ११४ | ११५ | DHIRAJ BAJRANG BHISE<br>धीरज बजरंग भिसे | आ.दु.घ | खुला-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | रा.म.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत रा.म.उपविभाग क्र.१, जालना येथील रिक्त पदी |
| ११५ | ११६ | CHETAN ARUN NIMBALKAR<br>चेतन अरुण निंबाळकर | आ.दु.घ | खुला-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, जळगांव, मंडळ कार्यालय येथील रिक्त पदी |
| ११६ | ११७ | PRASHANT UTTAM NARALE<br>प्रशांत उत्तम नरळे | इ.मा.व. | खुला-सामान्य | **कोकण-२** | मुंबई बांधकाम मंडळ, चेंबूर अंतर्गत चेंबूर, सा.बां.उपविभाग, मुख्यालय, कुर्ला, मुंबई येथील रिक्त पदी |
| ११७ | ११८ | UMESH BHARAT MASAL<br>उमेश भरत मासाळ | भ.ज.(क) | भ.ज. (क)-Gen | **कोकण-२** | सा.बां. मंडळ, रायगड अंतर्गत सा.बां. उपविभाग क्र.१, पनवेल येथील रिक्त पदी |
| ११८ | ११९ | YASH DHANANJAY BORSE<br>यश धनंजय बोरसे | इ.मा.व. | इ.मा.व.-सामान्य | **नाशिक** | सा.बां.मंडळ, जळगांव अंतर्गत सा.बां.उपविभाग, जामनेर येथील रिक्त पदी. |
| ११९ | १२० | SHUBHAM AANAND GHULAXE<br>शुभम आनंद घुलक्षे | इ.मा.व. | इ.मा.व.-सामान्य | **अमरावती** | सा.बां.मंडळ, अकोला अंतर्गत जागतिक बँक प्रकल्प उपविभाग, अकोला येथील रिक्त पदी |
| १२० | १२१ | ROHIT MOHAN JAGTAP<br>रोहित मोहन जगताप | आ.दु.घ | इडब्ल्यूएस-सामान्य | **कोकण-२** | मुंबई बांधकाम मंडळ, चेंबूर अंतर्गत चेंबूर, सा.बां.उपविभाग, मुख्यालय, कुर्ला, मुंबई येथील रिक्त पदी |
| १२१ | १२२ | OMKAR SUNIL NARHARE<br>ओंकार सुनिल नरहरे | इ.मा.व. | इ.मा.व.-सामान्य | **कोकण-१** | सा.बां.मंडळ, ठाणे अंतर्गत सा.बां.विभाग, पालघर येथील रिक्त पदी |
| १२२ | १२३ | NILESH SAMBHAJI PATIL<br>निलेश संभाजी पाटील | आ.दु.घ | इडब्ल्यूएस-सामान्य | **कोकण-१** | सा.बां.मंडळ, ठाणे अंतर्गत सा.बां.विभाग, पालघर येथील रिक्त पदी |
| १२३ | १२४ | SITARAM RAWASAHEB SAWANT<br>सीताराम रावसाहेब सावंत | आ.दु.घ | इडब्ल्यूएस-सामान्य | **छत्रपती संभाजीनगर** | रा.म.मंडळ, छत्रपती संभाजीनगर अंतर्गत रा.म.उपविभाग क्र.१, जालना येथील रिक्त पदी |

